वितरण आदेश क्र.९
सन २०१८-१९

**मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी,**
**नाथनगर, (उत्तर), पैठण, जिल्हा - औरंगाबाद**
**सहाय्यक अनुदान २०१८-२०१९ (अनिवार्य)**
**(तिसरा व अंतिम हप्ता)**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मप्रप्र २०१८/प्र.क्र.६८/१८/१२ अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०८ जानेवारी, २०१९

<u>वाचा :</u> १. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१८/प्र.क्र.६९/अर्थसंकल्प ३, दि.२ एप्रिल, २०१८.
२. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. बीयुडी-२०१८/ प्र.क्र.७० /२०१८/२५, दि.४ एप्रिल, २०१८
३. सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.मप्रप्र २०१८/प्रक्र.६८/१८/१२-अ दि.२४ एप्रिल,२०१८
४. निबंधक, मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर (उत्तर) पैठण, जि. औरंगाबाद यांचे क्र.२०१८/मप्रविप्र/ लेखा अनुदान/ कावी-३१५ दि.११.६.२०१८
५. सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.मप्रप्र २०१८/प्रक्र.६८/१८/१२-अ दि.२४ जुलै, २०१८
६. निबंधक, मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर (उत्तर) पैठण, जि. औरंगाबाद यांचे क्र.२०१८/मप्रविप्र/ लेखा अनुदान/ कावी-६०१ दि.२०.१२.२०१८

<u>प्रस्तावना :-</u>

मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, जिल्हा-औरंगाबाद या संस्थेला सन २०१८-२०१९ या आर्थिक वर्षाच्या अनिवार्य खर्चासाठी संदर्भाधीन क्र.१ च्या शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये वेतनेतर रु.२०.०० लाख व वेतने रु.१००.०० लाख अशी एकूण रु. १२०.०० लाख ( अक्षरी रुपये एकशो, वीस लाख फक्त ) इतकी तरतूद करण्यात आली आहे, या तरतूदीपैकी, ७० % च्या मर्यादेत प्रथम नऊ महिन्यांचा खर्च भागविण्यासाठी रु. ८४.०० लाख तरतूद उपलब्ध झाली आहे. संदर्भाधीन क्र.२ च्या शासन परिपत्रकान्वये सदर अनिवार्य सहाय्यक अनुदान नियंत्रक अधिकाऱ्यांच्या स्वाधीन करण्यात आले आहे.

२. मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, औरंगाबाद या संस्थेला संदर्भाधीन क्र.३ व संदर्भाधीन क्र. ५ च्या शासन निर्णयान्वये विकास प्रशिक्षण व तद्नुषंगिक खर्च तसेच अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन यासाठी आतापर्यंत वेतनेतर रु. ४,००,०००/- व वेतनेकरिता रु.४५,००,०००/-असे एकूण रु. ४९,००,०००/- (अक्षरी रुपये एकोणपन्नास लाख, फक्त) इतके अनिवार्य ३१ सहाय्यक अनुदान ( वेतनेतर ) व ३६ सहायक अनुदान ( वेतने ) पहिला व दुसरा हप्ता म्हणून वितरित करण्यात आला आहे.

३. वितरीत तरतूदी खर्ची पडल्याने संस्थेने वेतन व कार्यालयीन खर्च यासाठी पुढील निधीची मागणी वर नमूद दि.२०.१२.२०१८ च्या पत्रान्वये केली आहे. त्यानुसार आवश्यक तो निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

आता, संस्थेस संदर्भाधीन क्र. ६ च्या पत्रान्वये संस्थेने वेतने करिता निधीची मागणी केल्यानुसार, वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र. १ च्या शासन परिपत्रकानुसार एकूण अर्थसंकल्पिय अनुदानाच्या ७०% च्या मर्यादेत, अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेल्या सहायक अनुदानामधून विकास, प्रशिक्षण व तद्नुषंगिक खर्च तसेच अधिकारी व कर्मचारी यांच्या वेतन खर्चासाठी वेतनेतर रु. ६,००,०००/- व वेतने रु.१८,००,०००/-असे एकूण रु. २४,००,०००/- (अक्षरी रुपये चोवीस लाख, फक्त) इतकी तरतूद अनुक्रमे अनिवार्य ३१ सहाय्यक अनुदान ( वेतनेतर ) व ३६ सहायक अनुदान ( वेतने ) याखाली वितरित करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. हा खर्च मागणी क्र. ए-४, मुख्य लेखाशिर्ष "२०७० - इतर प्रशासनिक सेवा - ००३ - प्रशिक्षण (००) (०७) मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, औरंगाबाद या संस्थेस सहाय्यक अनुदान (अनिवार्य ) ( २०७० ०७४६ ) याखाली सन २०१८-२०१९ या आर्थिक वर्षासाठीच्या मंजूर तरतुदीतून "३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर )" याखाली रु.६,००,०००/- ( रुपये दहा लाख फक्त ) व "३६ सहाय्यक अनुदाने (वेतने )" याखाली रु. १८,००,००० /-(रुपये अठरा लाख फक्त ) याप्रमाणे भागविण्यात यावा.

३. सदरहू मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची संबंधित कोषागारातून काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र १५ दिवसांच्या आत शासनास सादर करावे.

४. संस्थेने आर्थिक वर्ष २०१८-२०१९ मधील मंजूर अनुदानाइतका खर्च सिमित ठेवावा.

५. संस्थेने आता वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे तपशीलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.

६. मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, जिल्हा-औरंगाबाद या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार, महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्रक्र.६९/अर्थ-३ दि. २ एप्रिल, २०१८ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ८ मधील नमूद अटींची पूर्तता प्रस्तुत प्रस्तावात होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१०८१५२४५९५१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Vilas Ramdas Thakur
Date: 2019.01.08 15:41:21 +05'30'

**( वि.रा. ठाकूर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति:-**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर,
३) मा. अ.मु. स.(सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
४) विभागीय आयुक्त, औरंगाबाद.
५) संचालक, मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, औरंगाबाद
६) उप संचालक, लेखा व कोषागारे, औरंगाबाद
७) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद
८) उप कोषागार कार्यालय, पैठण, जि.औरंगाबाद.
९) वित्त विभाग (व्यय-४/ अर्थसंकल्प १४), मंत्रालय, मुंबई
१०) अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन क्रमांक-२५, मंत्रालय, मुंबई
११) निवड नस्ती. (सामान्य प्रशासन विभाग/कार्या. १२ अ).